अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारीत नियम, २०१२ अंतर्गत राज्यातील वनहक्क धारकांना शासनाच्या सर्व योजनांचा लाभ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः वहका -२०२३/प्र.क्र.२१८/का-१४

आदिवासी विकास विभाग, मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि.१३ मार्च,२०२४

**वाचा:**

१. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ आणि नियम २००८ व सुधारित नियम २०१२.
२. जनजाती कार्य मंत्रालय यांचे दि.१५/१/२०१९ रोजीचे पत्र
३. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.वहका-२०२१/प्र.क्र.१८७/का-१४,दि.१२/९/२०२२
४. जनजाती सल्लागार परिषद दि.११/१०/२०२३ रोजी पार पडलेली बैठक.
५. मा.मंत्रिमंडळाची दि.११/०३/२०२४ रोजी पार पडलेली बैठक.

**प्रस्तावना -**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी ( वनहक्कांची मान्यता ) अधिनियम, २००६ दि.३१.१२.२००७ पासून राज्यात लागू करण्यात आला असून सदर कायद्याची अंमलबजावणी दि.०१.०१.२००८ पासून राज्यात करण्यात येत आहे. सदर अधिनियमाच्या कलम ३ (१) अन्वये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना वैयक्तिक व सामूहिक वनहक्क किंवा दोहोंचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत. सदर अधिनियमाच्या नियम १६ अनुसार व वनहक्क धारकांना सर्व योजनांची लाभ देण्याची तरतूद असतांना देखील वनहक्क धारकांना विविध विभागाच्या शासकीय योजनांचा लाभ देतांना भारतीय वन अधिनियमांतील तरतूदींची अडचण येत असल्याने वन विभागाकडून त्यास प्रतिबंध करण्यात येतो. त्यामुळे वनहक्क धारकांना विविध योजनांचा लाभ देण्यासाठी लोकप्रतिनिधी,विविध संघटना यांचेकडून वारंवार मागणी करण्यात येते. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारीत नियम, २०१२ मधील नियम १६ अन्वये वनहक्क दावे मंजूरीनंतर वनहक्क धारकांना सर्व शासकीय योजनांचा लाभ देण्याची तरतूद असून ओरिसा राज्यात सर्व शासकीय योजनांचा लाभ वनहक्क धारकांना देण्यात येत असल्याने याबाबतचा प्रस्ताव मा.मंत्रीमंडळासमोर सादर करण्याबाबत दि.११/१०/२०२३ रोजी पार पडलेल्या जनजाती सल्लागार परिषदेच्या बैठकित निर्देश देण्यात आले होते. त्यास अनूसरून वनहक्क धारकांना सर्व शासकीय योजनांचा लाभ अनूज्ञेय करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय -**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारीत नियम, २०१२ मधील नियम १६ अनुसार राज्यातील वनहक्क धारकांना सर्व शासकीय योजनांचा लाभ देण्यात यावा. वनहक्क धारकांना **सोबत जोडलेल्या विवरणपत्रा मध्ये नमूद केलेल्या सर्व शासकीय योजनां व कामांचा लाभ देण्यात यावा. तसेच सोबत जोडलेल्या विवरणापत्रा व्यतिरिक्त अन्य अनुज्ञेय अशा सर्व शासकीय योजनांचा लाभ देण्यात यावा** वनहक्क धारकांना योजना/कामे यांचा लाभ देतांना पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१. वनहक्क धारकांमध्ये ते ज्या शासकीय योजनांच्या लाभास पात्र आहेत त्याबाबत जनजागृती करण्यात यावी .
२. ज्या योजनांचे लाभ वनहक्कधारकांना त्यांच्या मागणीनुसार वैयक्तिक रित्या देणे शक्य आहे,अशा योजनांचा लाभ विनाविलंब वनहक्क धारकांना देण्यात यावा.
३. सामुहिकरित्या शासकीय योजनांचे लाभ वनहक्क धारकांना मिळण्याच्या दृष्टीने वनपट्टे दिलेल्या वनहक्क धारकांचे क्षेत्रनिहाय समूह (Cluster) तयार करण्यात यावेत.
४. क्षेत्रनिहाय समूह तयार केल्यावर वनहक्क धारकांच्या मागणीनुसार ज्या योजनांचा लाभ एकत्रितरित्या वनहक्क धारकांना देणे शक्य आहे, त्याबाबत कालबद्ध आराखडा तयार करून विविध शासकीय योजनांचे लाभ अभिसरणाच्या माध्यमातून वनहक्क धारकांना देण्यात यावेत.
५. उपरोक्त नमूद सामुहिकरित्या शासकीय योजनांचे लाभ देण्याच्या अनुषंगाने कालबद्ध आराखडा तयार करण्याची कार्यवाही आदिवासी विकास विभागाच्या वाचा येथील अनु.क्र.३ मधील दि.१२/९/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सामुहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या तालुका स्तरीय कन्व्हर्जन्स समितीने करावी.
६. सदर आराखड्यास मान्यता देण्याची कार्यवाही आदिवासी विकास विभागाच्या वाचा येथील अनु.क्र.३ मधील दि.१२/९/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सामुहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीने करावी.
७. वनहक्क धारकांना ज्या शासकीय योजनांचे लाभ देण्यास काही अडचणी उद्भवत असतील,अशा प्रकरणी अडचणींचे निराकरण जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील गठीत केलेल्या जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीने त्वरीत

करुन अशा योजनांचे लाभ वनहक्क धारकांना मिळतील याची खातरजमा करावी.

**सदर शासन निर्णय हा दि.११/३/२०२४ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३१४१०४८४९१०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2024.03.14 11:03:43 +05'30'

**( सतीश वि.कोवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.
८. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव ,मंत्रालय,मुंबई.
९. मा. सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव.मंत्रालय,मुंबई.
१०. मा. सर्व राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
११. मा. विधानसभा / विधान परिषद, सदस्य सर्व
१२. मुख्य सचिव,यांचे उप सचिव,मंत्रालय,मुंबई
१३. अ.मु.स./प्र.स./सचिव,विभाग सर्व ,मंत्रालय मुंबई.
१४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१६. सर्व जिल्हाधिकारी,
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक
१८. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक.
१९. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर.

२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,
२१. सर्व जिल्हा कृषी अधिकारी,
२२. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
२३. सर्व कार्यकारी अभियंता,जलसंपदा विभाग
२४. सर्व कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग
२५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
२६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
२७. सर्व नियंत्रक अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. निवडनस्ती कार्यासन १४

## शासन निर्णय क्र.आविवि-२०२३/प्र.क्र.२१८/का-१४,दि.१३ मार्च,२०२४ सोबतचे विवरणपत्र
## वनहक्क धारकांना लाभ द्यावयाच्या योजना व कामे

| अ.क्र. | Scheme and Work Name | योजना व कामाचे नाव |
|---|---|---|
| १ | Pradhan Mantri Krushi Sinchan Yojana (PMKSY) | प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना |
| २ | Central and State Krishi Yantrikikaran Abhiyan | केंद्र आणि राज्य कृषी यांत्रिकीकरण अभियान |
| ३ | Rashtriya anna suraksha abhiyan | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान |
| ४ | Birsa Munda Krishi Kranti Yojana ... | बिरसा मुंडा कृषी क्रांती योजना |
| ५ | Integrated Horticulture Development Abhiyan | एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान |
| ६ | Dry Area Development Scheme | कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रम |
| ७ | Bhausaheb Phundkar orchard Yojana | भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना |
| ८ | National Krishi Development Yojana | राष्ट्रीय कृषी विकास योजना - |
| १० | Mukhyamantri Shashwat Krishi Sinchan Yojana | मुख्यमंत्री शाश्वत कृषी सिंचन योजना |
| ११ | Pradhanmantri Crop Insurance Yojana | प्रधानमंत्री पिक विमा योजना |
| १२ | Construction of PMAY-G House Building | प्रधानमंत्री आवास योजनेत मंजूर घराच्या इमारतीचे बांधकाम |
| १३ | Construction of State scheme Houses Building | राज्य योजनेत मंजूर घरांच्या इमारतीचे बांधकाम |
| १४ | Construction of Pebble peripheral/farm/field Bund | शेतजमीन लगत गारगोटी बंधारा बांधणे |
| १५ | Construction of Earthen contour Bund | मातीचा समोच्च बांध बांधणे |
| १६ | Construction of Pebble contour Bund | गारगोटी समोच्च बांध बांधणे |
| १७ | Construction of Stone contour Bund | दगडी समोच्च बांध बांधणे |
| १८ | Construction of Earthen graded Bund | विविध मातीचा प्रकार असलेला बांध बांधणे |
| १९ | Construction of Pebble graded Bund | विविध गारगोटी प्रकार बांध बांधणे |
| २० | Construction of Stone graded Bund | विविध दगडी प्रकार बांध बांधणे |
| २१ | Development of Silvipasture Grasslands | सिल्विपाश्चर पद्धतीने गवताळ प्रदेशांचा विकास करणे. |
| २२ | Levelling / shaping of Wasteland / Fallow land | पडीक/समतोल जमिनीचे सपाटीकरण |
| २३ | Drainage of chaur or waterlogged areas Land | चौर किंवा पाणी साचलेल्या भागातील जमिनीचा निचरा |
| २४ | Construction of Brushwood Check Dam | ब्रशवुड पद्धतीचा बंधारा बांधणे |
| २५ | Construction of Boulder Check Dam | दगडी बंधारा बांधणे |
| २६ | Construction of Gabion Check Dam | गॅबियन बंधारा चे बांधकाम |
| २७ | Construction of Compost Pit | कंपोस्ट पिटचे बांधकाम |
| २८ | Construction of Vermi Compost structure | वर्मी कंपोस्ट संरचना बांधणे |

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
Date: 2024.03.14 11:04:09 +05'30'

| | | |
|---|---|---|
| २९ | Construction of NADEP Compost structure | NADEP कंपोस्ट संरचनेचे बांधकाम |
| ३० | Construction of Berkeley Compost Pit | बर्कले कंपोस्ट पिटचे बांधकाम |
| ३१ | Construction of Irrigation Open Well | खुल्या विहिरीचे बांधकाम (सिंचन) |
| ३२ | Construction of Fish Drying Yards | मासे वाळवण्यासाठी यार्डचे बांधकाम |
| ३३ | Wasteland Line Plantation of Forestry Trees | पडीक जमिनीवर वृक्ष लागवड (वनीकरण) |
| ३४ | Line Plantation of Shelter Belt Trees | शेल्टरबेल्ट पद्धतीने वृक्षांचे वृक्षारोपण |
| ३५ | Block Plantation of Horticulture Trees in fields | शेतात फलोत्पादनाच्या झाडांची लागवड करणे |
| ३६ | Wasteland Block Plantation of Horticulture Trees | पडीक जमिनीत फलोत्पादन वृक्ष लागवड |
| ३७ | Block Plantation of Farm Forestry Trees in Fields | शेतातील वनीकरणाच्या उद्देशाने झाडांची लागवड लागवड करणे. |
| ३८ | Block Plantation of Forestry Trees in Fields | वनीकरणाच्या झाडांची लागवड करणे |
| ३९ | Wastelands Block Plantation of Forestry Trees | पडीक जमिनीत वनीकरणाच्या उद्देशाने वृक्ष लागवड |
| ४० | Block Plantation of Sericulture Trees in fields | शेतात रेशीम (तुती) झाडांची लागवड करणे |
| ४१ | Wastelands Block Plantation of Sericulture Trees | पडीक जमिनीत रेशीम (तुती) झाडांची लागवड करणे |
| ४२ | Block Plantation of Bio drainage Trees in Fields | शेतात बायोड्रेनेज प्रजातीच्या झाडांची लागवड करणे. |
| ४३ | Wasteland Block Plantation of Bio Drainage Trees | पडीक जमिनीत बायोड्रेनेज प्रजातीच्या झाडांची लागवड करणे. |
| ४४ | Afforestation of wastelands using Forestry trees | वनीकरणाच्या झाडांचा वापर करून पडीक जमिनीवर वृक्षारोपण करणे. |
| ४५ | Construction of Earthen Gully Plugs | मातीच्या गल्ली प्लगचे बांधकाम |
| ४६ | Construction of Stone boulder Gully Plugs | दगडी गली प्लगचे बांधकाम |
| ४७ | Raising of Nursery | रोपवाटिका वाढवणे/तयार करणे. |
| ४८ | Construction of Mini Percolation Tank | छोट्या पाझर तलावाचे बांधकाम |
| ४९ | Construction of Farm Ponds | शेततळ्यांचे बांधकाम |
| ५० | Construction of Recharge Pits | पुनर्भरण खड्डे बांधणे |
| ५१ | Construction of Sand filter for Bore well recharge | बोअरवेल पुनर्भरणासाठी वाळू फिल्टरचे बांधकाम |
| ५२ | Construction of Sand filter for Open well recharge | खुल्या विहीर पुनर्भरणासाठी मातीचे फिल्टर बांधणे |
| ५३ | Construction of Cattle Shelter | गुरांच्या निवाऱ्यासाठी शेड तयार करणे |
| ५४ | Construction of Goat Shelter | शेळी निवाऱ्यासाठी शेड तयार करणे |
| ५५ | Construction of Piggery Shelter | डुक्कर निवाऱ्यासाठी शेड तयार करणे |
| ५६ | Construction of Poultry Livestock Shelter | पोल्ट्री शेड तयार करणे |
| ५७ | Construction of Soak Pit | शोष खड्डा बांधकाम. |

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b55097015ocf7dc69d276db3b1a6ebe3f7161 0fb5e8ff55b1676c6a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD40055BE874837539 9762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2024.03.14 11:04:29 +05'30'

| | | |
|---|---|---|
| ५८ | Construction of Level Bench Terrace | लेव्हल बेंच टेरेसचे बांधकाम |
| ५९ | Construction of Upland Bench Terrace | अपलँड बेंच टेरेसचे बांधकाम |
| ६० | Construction of Single Unit Toilets | सिंगल युनिट शौचालयाचे बांधकाम |
| ६१ | Construction of Staggered Trench | स्टॅगर्ड ट्रेंच ट्रेंचचे बांधकाम |
| ६२ | Construction of Food grain Storage Building for Community | अन्नधान्य साठवण इमारतीचे बांधकाम/गोडाऊन बांधकाम |
| ६३ | Repair and Maintenance of Food grain Storage Building for Community | अन्नधान्य साठवण इमारतीची दुरुस्ती व देखभाल करणे/ गोडाऊन देखभाल आणि दुरुस्ती |
| ६४ | Construction of Feeder Canal for Community | फीडर कालव्याचे बांधकाम |
| ६५ | Construction of distributary Canal for Community | वितरिक कालव्याचे बांधकाम |
| ६६ | Construction of minor Canal for Community | लघु कालव्याचे बांधकाम |
| ६७ | Construction of sub-minor Canal for Community | उप-मायनर कालव्याचे बांधकाम |
| ६८ | Construction of water courses for Community | जलकुंभांचे बांधकाम |
| ६९ | Lining of Feeder Canal | फीडर कालव्याचे अस्तरीकरण |
| ७० | Lining of distributary Canal | वितरिक कालव्याचे अस्तरीकरण |
| ७१ | Lining of minor Canal | लघु कालव्याचे अस्तरीकरण |
| ७२ | Lining of sub-minor Canal | उप-मायनर कालव्याचे अस्तरीकरण |
| ७३ | Lining of water courses Canal | जलकुंभ कालव्याचे अस्तर |
| ७४ | Renovation of Feeder Canal | फीडर कालव्याचे नूतनीकरण |
| ७५ | Renovation of distributary Canal | वितरिक कालव्याचे नूतनीकरण |
| ७६ | Renovation of minor Canal | लघु कालव्याचे नूतनीकरण |
| ७७ | Renovation of sub-minor Canal | उप-मायनर कालव्याचे नूतनीकरण |
| ७८ | Repair and Maintenance of Feeder Canal | फीडर कालव्याची देखभाल आणि दुरुस्ती |
| ७९ | Repair and Maintenance of distributary Canal | वितरिक कालव्याची देखभाल आणि दुरुस्ती |
| ८० | Repair and Maintenance of minor Canal | लघु कालव्याची देखभाल आणि दुरुस्ती |
| ८१ | Repair and Maintenance of sub-minor Canal | उप-मायनर कालव्याची देखभाल आणि दुरुस्ती |
| ८२ | Repair and Maintenance of water course | जलवाहिनी कालव्याची देखभाल आणि दुरुस्ती |
| ८३ | Development of chaur Land | चौर जमिनीचा विकास |
| ८४ | Construction of Boulder Check Dam | बोल्डर चेक डॅमचे बांधकाम |
| ८५ | Construction of Masonry/CC Check Dam | दगडी बांधकाम/सीसी चेक डॅमचे बांधकाम |
| ८६ | Repair and Maintenance of Earthen Check Dam | मातीच्या चेक डॅमची देखभाल आणि दुरुस्ती |
| ८७ | Repair and Maintenance of Boulder Check Dam | बोल्डर चेक डॅमची देखभाल आणि दुरुस्ती |
| ८८ | Repair and Maintenance of Masonry/CC Check Dam | दगडी बांधकाम/सीसी चेक डॅमची देखभाल आणि दुरुस्ती |

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
Date: 2024.03.14 11:04:49 +05'30'

| | | |
|---|---|---|
| ८९ | Repair and Maintenance of Gabion Check Dam | गॅबियन चेक डॅमची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९० | Repair and Maintenance of Vermi Compost structure | वर्मी कंपोस्ट संरचनेची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९१ | Repair and Maintenance of NADEP Compost structure | NADEP कंपोस्ट संरचनेची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९२ | Repair and Maintenance of Berkeley Compost Pit | बर्कले कंपोस्ट पिटची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९३ | Repair and Maintenance of Compost Pit | कंपोस्ट पिटची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९४ | Construction of Diversion Storm Water Drain | वादळाच्या पाणी निचरा करणाऱ्या ड्रेनचे बांधकाम |
| ९५ | Repair and maintenance of Diversion Storm Water Drain | वादळाच्या पाणी निचरा करणाऱ्या ड्रेनचे बांधकाम देखभाल आणि दुरुस्ती |
| ९६ | Repair and maintenance of parapet & platform of Irrigation Open Well | खुल्या विहिरीच्या पॅरापेट आणि प्लॅटफॉर्मची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९७ | Construction of Irrigation Open Well for Groups | गटांसाठी सिंचन खुल्या विहिरीचे बांधकाम |
| ९८ | Repair and Maintenance of Fish Drying Yards | मासे सुकविण्याच्या मैदानाची देखभाल आणि दुरुस्ती |
| ९९ | Canal Line Plantation of Horticulture Trees | कालव्याच्या सभोवताली फलोत्पादन वृक्षांची लागवड |
| १०० | Boundary Line Plantation of Horticulture Trees | सीमारेषेवर फलोत्पादन वृक्षांची लागवड |
| १०१ | Boundary Line Plantation of Farm Forestry Trees | शेताच्या सीमारेषेवर वनीकरण वृक्षांची लागवड |
| १०२ | Canal Line Plantation of Forestry Trees | कालव्याच्या सभोवताली वनीकरणाच्या झाडांची लागवड |
| १०३ | Boundary Line Plantation of Forestry Trees | सीमारेषेवर वनीकरणाच्या झाडांची लागवड |
| १०४ | Road side line plantation of Forestry Trees | रस्त्याच्या कडेला वनीकरणाच्या झाडांची लागवड |
| १०५ | Boundary Line Plantation of Shelter Belt Trees | सीमारेषेवर शेल्टरबेल्ट पद्धतीने वृक्षांची लागवड |
| १०६ | Road Line Plantation of Shelter Belt Trees | रस्त्याच्या शेजारी शेल्टर बेल्ट वृक्षांची लागवड |
| १०७ | Along the coast Line Plantation of Coastal Shelter Belt Trees | किनारपट्टीवर शेल्टर बेल्ट वृक्षांची लागवड |
| १०८ | Fields Block Plantation of Horticulture Trees | ब्लॉक पद्धतीने फलोत्पादन वृक्षांची लागवड |
| १०९ | Wasteland Block Plantation of Farm Forestry Trees | ब्लॉक पद्धतीने शेता शेजारी वनीकरणाच्या झाडांची लागवड |
| ११० | Along the coast Block Plantation of Forestry Trees | वनीकरणाच्या झाडांची लागवड |
| १११ | Wasteland Block Plantation of Sericulture Trees | वेस्टलँड ब्लॉक रेशीम लागवडीच्या झाडांची लागवड |
| ११२ | Block Plantation of Bio drainage Trees in fields | शेतात जैविक निचरा झाडांची लागवड करणे |

SATISH VITHALRAO KOVE

| | | |
|---|---|---|
| ११३ | Block Plantation of Bio drainage trees in Wastelands | पडीक जमिनीत जैविक निचरा वृक्ष लागवड करणे |
| ११४ | Repair and maintenance of Earthen Gully Plugs | मातीच्या गुली प्लगची दुरुस्ती आणि देखभाल |
| ११५ | Repair and maintenance of Stone boulder Gully Plugs | दगडी गली प्लगची दुरुस्ती आणि देखभाल |
| ११६ | Raising of Nursery | गटांसाठी रोपवाटिका उभारणे |
| ११७ | Raising of Nursery for Groups | रोपवाटिका उभारणे |
| ११८ | Construction of Fisheries Ponds | मत्स्यपालन तलावांचे बांधकाम |
| ११९ | Repair and maintenance of Fisheries Ponds | मत्स्यपालन तलावांची दुरुस्ती आणि देखभाल |
| १२० | Renovation of Fisheries Ponds | मत्स्यपालन तलावांचे नूतनीकरण |
| १२१ | Construction of infrastructure for Liquid Bio Manure for Groups | गटांसाठी द्रव जैव खतासाठी पायाभूत सुविधांचे बांधकाम |
| १२२ | Repair and Maintenance of Infrastructure for Liquid Bio Manure | द्रव जैव खतासाठी पायाभूत सुविधांची दुरुस्ती आणि देखभाल |
| १२३ | Construction of Crematorium for community | समुदायासाठी स्मशानभूमीचे बांधकाम |
| १२४ | Repair and Maintenance of Crematorium | स्मशानभूमीची दुरुस्ती आणि देखभाल |
| १२५ | Construction of Community Water Harvesting Ponds | सामुदायिक जल संचयन तलावांचे बांधकाम |
| १२६ | Construction of Fisheries Ponds for Community | समुदायासाठी मत्स्यपालन तलाव बांधणे |
| १२७ | Repair and maintenance of Fisheries Ponds for Community | समुदायासाठी मत्स्यपालन तलावांची दुरुस्ती आणि देखभाल |
| १२८ | Repair and maintenance of Community Water Harvesting Ponds for Community | समुदायासाठी सामुदायिक जल संचयन तलावांची दुरुस्ती आणि देखभाल |
| १२९ | Renovation of Fisheries Ponds for Community | समाजासाठी मत्स्यपालन तलावांचे नूतनीकरण |
| १३० | Renovation of Community Water Harvesting Ponds for Community | सामुदायिक जल संचयन तलावांचे नूतनीकरण |
| १३१ | Construction of Mitti Murram Roads for Community | समाजासाठी मुरम मातीच्या रस्त्यांचे बांधकाम |
| १३२ | Repair and maintenance of Mitti Murram Roads for Community | मुरम मातीच्या रस्त्यांची दुरुस्ती आणि देखभाल |
| १३३ | Construction of Embankment for community | समुदायासाठी तटबंधाचे बांधकाम |

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2024.03.14 11:05:28 +05'30'

**( सतीश कोवे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**